**जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,**
**सामान्य राज्य सेवा ,गट अ या**
**पदावर नियुक्तीबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन आदेश क्र. सैकवि-२०११/प्र.क्र.३४९/का.२८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक १८ नोव्हेंबर,२०११.

**वाचा :**(१) अवर सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई यांचे पत्र क्रमांक २२४७ / ४७४६/दहा ,दिनांक ६ ऑक्टोबर,२०१०.
(२) शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:सैकवि-२००८/५२२/प्र.क्र.१४७/ का.२८,दिनांक २९ मार्च, २०११.
(३) अवर सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई यांचे पत्र क्रमांक २२४७ / ४७४६/दहा ,दिनांक २० जुलै,२०११.
(४) संचालक,सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक:१२०२०/सैकवि-२/३७२९/ दिनांक १८ऑगस्ट,२०११..

**शासन आदेश :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांचे पत्र क्रमांक २२४७/४७४६/दहा,दिनांक ६ ऑक्टोबर,२०१०. अन्वये जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, गट-अ या पदावर शिफारस केलेल्या ६ उमेदवारांची शिफारस केली होती. या ६ उमेदवारांपैकी २ उमेदवारांनी जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, गट-अ या पदावरील उमेदवारी स्वीकारण्यास इच्छुक नसल्याचे लेखी पत्राद्वारे कळविल्याने व एक उमेदवार विहित कालावधीत रुजु झाला नाही व त्याने शासनास काही कळविलेही नाही. त्यामुळे या ३ उमेदवारांच्या जागी नवीन उमेदवारांची शिफारस करण्याबाबत महाराष्ट्र लोकसेवा आयोगास शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:सैकवि-२००८/५२२/प्र.क्र.१४७/का.२८,दिनांक २९ मार्च, २०११अन्वये कळविण्यात आले होते.

त्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांचे पत्र क्रमांक२२४७/ ४७४६/दहा ,दिनांक २० जुलै,२०११ अन्वये जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, गट- अ या पदावर शिफारस केलेल्या तीन उमेदवारांच्या पदस्थापनेबाबत संचालक,सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी त्यांच्या पत्र क्रमांक:१२०२०/सैकवि-२/३७२९/दिनांक १८ऑगस्ट,२०११ अन्वये सूचित केल्यानुसार या तीन उमेदवारांची खालील तक्त्यात त्यांच्या नावांसमोर स्तंभ-३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,गट- अ या पदावर रु.९३००-३४८००,ग्रेड पे ५००० या वेतनश्रेणीमध्ये ते या पदाचा कार्यभार ज्या दिनांकास स्वीकारतील त्या दिनांकापासून खालील अटींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | पदनाम व नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | ले.कर्नल (नि.) कुचू उपेंद्र भूषण नायडू, सोलापूर | जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, उस्मानाबाद. |

| | | |
|---|---|---|
| २ | ले.कर्नल (नि.) किशोर लक्ष्मण पेटकर, नाशिक | जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, रत्नागिरी. |
| ३ | ले. कर्नल (नि.)शैलेंद्र परशुराम भालेकर,पुणे | उपसंचालक (प्रशासन)सैनिक कल्याण विभाग, पुणे. |

**(अ)** वरील जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी यांनी सदरहू निर्णय प्राप्त झाल्यापासून ३० दिवसांत सदर पदावर रुजू होण्यासाठी संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांच्या कार्यालयात सविस्तर नियुक्तीचे आदेश प्राप्त करुन घेण्यासाठी हजर व्हावे. तथापि ३० दिवसांच्या कालावधीत ते हजर झाले नाहीत किंवा ऊशीरा रुजू होण्यासाठी त्यांनी राज्य शासनाची विशिष्टपणे पूर्व परवानगी घेतली नाही तर ते सदरहू पद स्वीकारण्यास इच्छुक नसल्याचे समजून पुढील कार्यवाही केली जाईल.

**(ब)** या जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी यांचा या पदाचा कार्यभार धारण केल्याच्या दिनांकापासून त्यांचा त्या पदावरील एक वर्षाचा कालावधी हा परिविक्षाधीन कालावधी असेल. परिविक्षाधीन कालावधीतील त्यांचे काम व वर्तणूक समाधानकारक नसेल तर त्यांच्या या पदावरील सेवा कोणत्याही आगाऊ सूचना न देता समाप्त करण्यात येतील.

**(क)** ही नियुक्ती खालील अटींच्या अधीन राहून असेल:

१) त्यांनी त्यांची सर्व शैक्षणिक अर्हतेबाबतची मूळ प्रमाणपत्रे व त्यांची प्रत्येकी १ साक्षांकीत प्रत व मूळ अधिवास प्रमाणपत्र व त्याची एक साक्षांकीत प्रत पदावर रुजू झाल्यापासून ३० दिवसांच्या आत शासनास सादर करावीत.

२) त्यांचा लष्करी सेवा अभिलेख पडताळणीबाबतचा अहवाल समाधानकारक असेल.

३) त्यांचा पूर्वचारित्र्य व वर्तणूक पडताळणीबाबतचा पोलिस विभागाचा अहवाल समाधानकारक असेल.

४) सदर नियुक्तीकरिता ते वैद्यकीयदृष्ट्या पात्र आहेत अशा आशयाचा सक्षम वैद्यकीय प्राधिका-याचा अहवाल शासनास प्राप्त होईल.

**(ड )** हे अधिकारी अगोदरच विहित मराठी व हिंदी परीक्षा उत्तीर्ण झालेले नसतील किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळण्यास पात्र नसतील तर शासनाने विहित केलेल्या मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे त्यांना आवश्यक राहील.

**(इ)** या अधिका-यांनी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/ २००१/३९, दि. ०७.०८.२००१ नुसार संगणक हाताळणी / वापराबाबतचे आवश्यक प्रमाणपत्र विहित कालावधीत संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांना सादर करणे आवश्यक राहील.

**(ई)** या अधिका-यांना महाराष्ट्र शासनाच्या गट-अ अधिका-यांना लागू असलेले नियम लागू राहतील.

**(उ)** या अधिका-यांची सेवाजेष्ठता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या प्राथम्य क्रमांकानुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली १९८२ च्या नियम ४(२) (अ) मधील तरतूदीनुसार निश्चित करण्यात येईल.

२.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११८११२५०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सि. मं. इनामदार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. संचालक,सैनिक कल्याण विभाग, पुणे, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय,रायगड,राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर, सोलापूर रस्ता, घोरपडी, पुणे - ४११ ००१

त्यांना विनंती करण्यात येते की, ले.कर्नल (नि.) कुचू उपेंद्र भूषण नायडू, सोलापूर,ले.कर्नल (नि.) किशोर लक्ष्मण पेटकर, नाशिक,ले. कर्नल (नि.)शैलेंद्र परशुराम भालेकर,पुणे यांच्या लष्करी सेवा अभिलेखाची काटेकोर तपासणी करण्यात यावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.तसेच महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या दिनांक २० जुलै,२०११ च्या पत्रात नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता केली जाईल हे पहावे व तसे शासनास अवगत करावे.

२) महालेखापाल (लेखा व परीक्षा) -१/२,महाराष्ट्र, मुंबई /नागपूर.

३)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई /नागपूर.

४)*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई - ४०० ००१.(पत्राने)

५) ले.कर्नल (नि.) कुचू उपेंद्र भूषण नायडू,५९/६४,मुग्धा बंग्लोज,विष्णुपूरी, जुळे सोलापूर-४१३००४.

६) ले.कर्नल (नि.) किशोर लक्ष्मण पेटकर,अभिषेक,हाऊस नंबर २४, एसव्हीवाय क्र.४७९, ज्ञानेश्वर हौसिंग सोसायटी, कोणार्क नगर, अडगांव शिवार,नाशिक-४२२००३

७) ले. कर्नल (नि.)शैलेंद्र परशुराम भालेकर,फ्लॅट नंबर के ५/५,साळुंखे विहार,कोंडवा- पुणे-४११०२२

८) जिल्हाधिकारी व अध्यक्ष ,जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय, उस्मानाबाद/ रत्नागिरी/पुणे.

९)जिल्हा कोषागार अधिकारी,जिल्हा कोषागार कार्यालय,उस्मानाबाद/ रत्नागिरी/पुणे.

१०)संबंधींताची वैयक्तिक नस्ती.

११)निवड नस्ती (२ प्रती)